**केंद्र पुरस्कृत एकात्मिक पाणलोट विकास व्यवस्थापन कार्यक्रम (IWMP)**
**सन २००९-१० मधील मंजूर पाणलोटांची अंमलबजावणीकरता राज्य हिस्सा वितरण**

महाराष्ट्र शासन
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
शासन निर्णय, क्र. एपाव्य- २०१०/प्र.क्र.१७/जल-८,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक : १३ सप्टेंबर, २०१०.**

**वाचा :-.**
१. शा. नि. ग्रा. वि. व ज. स. वि. क्र. सामासू २००९/प्र.क्र.४१/जल-२०, दिनांक २१ मे, २००८.
२. शा. नि. ग्रा. वि. व ज. स. वि. क्र. सामासू २००९/प्र.क्र.७/जल-८, दिनांक १७ एप्रिल, २००९.
३. शा. नि. ग्रा. वि. व ज. स. वि. क्र. एपाव्य ४४०९/प्र.क्र.५४/जल-८, दिनांक २२ डिसेंबर, २००९.
४. शा. नि. ग्रा. वि. व ज. स. वि. क्र. असक २००९/प्र.क्र.५४/जल-८, दिनांक २४ डिसेंबर, २००९.
५. शा. नि. ग्रा. वि. व ज. स. वि. क्र. एपाव्य ४४०९/प्र.क्र.५४/जल-८, दिनांक २३ फेब्रुवारी , २०१०.
६. शा. नि. ग्रा. वि. व ज. स. वि. क्र. असक २०१०/प्र.क्र.४५/जल-११, दिनांक १३ ऑगस्ट, २०१०
७. केंद्रीय ग्रा. वि. मंत्रालय, भूसंसाधन विभाग यांचे पत्र क्र K-11012/17/2009/IWMP/(महाराष्ट्र), दि. ३ जून, २०१०.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने १ एप्रिल २००८ पासून पाणलोट विकासाकरीता सामाईक मार्गदर्शक सूचना २००८ लागू केल्या असून केंद्रीय ग्रामीण विकास मंत्रालयाच्या भूसंसाधन विभागाने केंद्र पुरस्कृत एकात्मिक पाणलोट व्यवस्थापन कार्यक्रम (IWMP) जाहीर केला आहे. या कार्यक्रमास केंद्राचे ९० टक्के तर राज्याचे १० टक्के अर्थसहाय्य उपलब्ध होणार आहे. सामाईक मार्गदर्शक सूचना २००८ तसेच केंद्र शासनाने या संदर्भात वेळोवेळी दिलेल्या सूचनानुसार या कार्यक्रमाच्या अंमलबजावणीकरिता राज्यस्तरावर वसुंधरा राज्यस्तरीय पाणलोट विकास यंत्रणा (VSLNA) तसेच जिल्हास्तरावर जिल्हा पाणलोट विकास युनिट (DWDU) ची स्थापना संदर्भाधीन क्र.१ व २ येथील शासन निर्णयान्वये करण्यात आली आहे.

२. या (IWMP) कार्यक्रमांतर्गत सन २००९-१० या वर्षाकरिता केंद्र शासनाने राज्याला रु.९.९६ लक्ष हे. क्षेत्राचा समावेश असलेल्या २४३ पाणलोट प्रकल्पांना मंजुरी दिली असून या प्रकल्पाची अंमलबजावणी करण्याबाबत वर नमूद दि.२२ व २४ डिसेंबर, २००९ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. या प्रकल्पांची एकूण किंमत रु.१२५५.०८ कोटी ( रु. एक हजार दोनशे पंचावन्न कोटी आठ लक्ष फक्त) इतकी असून त्यामध्ये केंद्र हिस्सा (९०%) रु.११२९.५७ कोटी व राज्य हिस्सा (१०%) रु.१२५.५१ कोटी इतका आहे.

३. या कार्यक्रमाचा पहिला टप्पा प्रकल्पाच्या पूर्वतयारीचा असून त्यासाठी मार्गदर्शक सुचनानुसार प्रकल्प किमतीच्या २० % रक्कम अनुज्ञेय आहे. त्यानुसार पहिल्या हप्त्यात केंद्र हिश्श्याच्या ६ टक्के म्हणजे रु.६७.७७ कोटी इतका निधी केंद्र शासनाकडून प्राप्त झाला होता. या निधीचा अनुरूप राज्य हिस्सा रु.७.५३ कोटी वितरीत करुन वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणेच्या (VSLNA) युनियन बँक ऑफ इंडीया, पुणे येथील बचत खात्यामध्ये जमा करण्यात आला आहे. केंद्र शासनाच्या वर नमूद दि.३ जून, २०१० च्या पत्रान्वये सन २००९-१० च्या प्रकल्पाकरिता पहिल्या टप्प्यातील

शिल्लक १४ टक्के केंद्र हिश्श्याचा रू. १५८.१४००८ कोटी निधी केंद्र शासनाने राज्य शासनास वितरीत करुन वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणेच्या बचत खात्यामध्ये जमा केला आहे. या केद्र हिश्श्याच्या अनुरूप राज्य हिस्सा वसुंधरा राज्यस्तरीय पाणलोट विकास यंत्रणेस उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

वसुंधरा राज्यस्तरीय पाणलोट विकास यंत्रणेमार्फत राबविण्यात येणा-या एकात्मिक पाणलोट व्यवस्थापन कार्यक्रमांतर्गत प्राप्त होणा-या केंद्र हिश्श्याच्या अनुरुप राज्य हिस्सा उपलब्ध करून देण्यासाठी जुलै, २०१० च्या पावसाळी अधिवेशनात रु. ४०.०० कोटीची पुरवणी मागणी बाब क्र. १५४ अन्वये विधीमंडळाच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आली होती. वर नमूद दि. १३ ऑगस्ट, २०१० च्या शासन निर्णयात नमूद केल्यानुसार विनियोजन विधेयक विधीमंडळात मंजूर झाल्याने व मा. राज्यपालांनी त्यास समती दिल्याने ते महाराष्ट्र ( द्वितीय पुरवणी) विनियोजन अधिनियम, २०१० ( सन २०१० चा महाराष्ट्र अधिनियम क्र. २० ) म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग-४ मध्ये प्रसिध्द करण्यात आले आहे. त्यामुळे पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पीत झालेल्या तरतूदी आता वितरणासाठी उपलब्ध झाल्या आहेत.

केंद्र शासनाच्या ग्रामीण विकास मंत्रालयाच्या भूसंसाधन विभागाच्या वर नमूद दि.३ जून, २०१० च्या पत्रान्वये सन २००९-१० च्या प्रकल्पांकरिता पहिल्या टप्प्यातील शिल्लक १४ टक्के केंद्र हिश्श्याची रू. १५८.१४००८ कोटी निधी केंद्र शासनाने राज्य शासनास वितरीत करुन वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणेच्या बचत खात्यामध्ये जमा केले आहेत. या केद्र हिश्श्याच्या अनुरुप रु. १७.५७१४ कोटी एवढा राज्य हिस्सा वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणेस अनुज्ञेय असून तो पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रु. ४०.०० कोटी निधीतून वितरीत करण्यास शासन मान्यता देत आहे.

२. केंद्र शासनाच्या सन २००९-१० मधील मान्यताप्राप्त २४३ प्रकल्पांच्या रु.१२५५.०८ कोटी प्रकल्प किंमतीपैकी १४% प्रमाणे मंजूर केलेला निधी वसुंधरा राज्यस्तरीय पाणलोट विकास यंत्रणेस (VSLNA) खालील दर्शविलेल्या अर्थसंकल्पीय घटकासाठी खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे:-

**(रु. लाखात)**

| अर्थसंकल्पीय घटक | टक्केवारी | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
|---|---|---|---|
| Administrative costs | २ % | २२५९.१५ | २५१.०२ |
| Monitoring | ०.२ % | २२५.९२ | २५.१० |
| Evaluation | ०.३ % | ३३८.८८ | ३७.६५ |
| Institution & capacity Building | २ % | २२५९.१५ | २५१.०२ |
| Watershed Works Phase- | | | |
| Watershed Development works | ७.५ % | ८४७१.८२ | ९४१.३३ |
| Livelihood activities for the asset less persons, | १ % | ११२९.५८ | १२५.५१ |
| production system and micro enterprises; | १% | ११२९.५८ | १२५.५१ |
| एकूण | १४% | १५८१४.०८ | १७५७.१४ |

३. वरीलप्रमाणे वितरित करण्यात येत असलेला राज्य हिस्सा रू १७.५७१४ कोटी VSLNA च्या खात्यात जमा करण्यासही शासन मान्यता देत आहे.

४. आयुक्त (कृषि) यांना सदरहू निधी आहरित करण्यास व वसुंधरा राज्यस्तरीय पाणलोट विकास यंत्रणेच्या खात्यावर जमा करण्यास या शासन निर्णयान्वये प्राधिकृत करण्यात येत असून या निधीसाठी त्याना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी रु.१७.५७१४ कोटीचा धनादेश मुख्य कार्यकारी अधिकारी, वसुंधरा

राज्यस्तरीय पाणलोट विकास यंत्रणा, पुणे यांचे नांवे काढून त्याना अदा करावा. या बाबतचा खर्च **"मागणी क्रमांक एल-७ लेखाशिर्ष ४४०२-मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च,१०२ मृदसंधारण - (०२) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०२) (०४) एकात्मिक पाणलोट क्षेत्र विकास व्यवस्थापन कार्यक्रम-(४४०२ २३९६) ३१ सहायक अनुदान"** या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. हा निधी संगणक वितरण प्रणालीवर सप्टेंबर, २०१० मध्ये उपलब्ध करून देण्यात आला आहे.

५. या शासन निर्णयाद्वारे वितरीत केलेला राज्य हिस्सा मुख्य कार्यकारी अधिकारी, वसुंधरा राज्यस्तरीय पाणलोट विकास यंत्रणा यांनी VSLNA च्या मान्यतेने जिल्हा पाणलोट विकास यंत्रणा (DWDU) यांना वितरीत करावा.

६. त्याचप्रमाणे संचालक, मृदसंधारण तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, वसुंधरा राज्यस्तरीय पाणलोट विकास यंत्रणा यांनी केंद्र शासनाचे संदर्भाधीन दि.३ जून,२०१० मधील पत्राच्या अटी व शर्ती नुसार पुढील कार्यवाही करावी.

७. हया कार्यक्रमाची वसुंधरा राज्यस्तरीय पाणलोट विकास यंत्रणा (VSLNA) च्या मान्यतेने भौतिक व आर्थिक प्रगती केंद्र शासनाने विहित केलेल्या प्रपत्रांमधून केंद्र शासनास सादर करावी व त्याची एक प्रत राज्य शासनास सादर करावी.

८. सदर आदेश नियोजन विभागाच्या व वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारीक सदर्भ क्र. १७४/१०/व्यय-१५ दिनाक २३ जून, २०१० व अनौपचारीक सदर्भ क्र. ६१५/१०/ अर्थ-१७ दिनाक ३१ ऑगस्ट, २०१० अन्वये दिलेल्या मंजूरीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

९. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक **२०१००९१३१९०५४७००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

**( वि. रा. ठाकूर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,
मा.मंत्री (जलसंधारण), यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री, (जलसंधारण) यांचे खाजगी सचिव
सचिव, केंद्रीय ग्रामीण विकास मंत्रालय (भूसंसाधन विभाग )निर्माण भवन, नवी दिल्ली
सहसचिव केंद्रीय ग्रामीण विकास मंत्रालय (भूसंसाधन विभाग ) ब्लॉक क्र ११, ६वा मजला सिजिओ कॉम्प्लेक्स, लोधीमार्ग, नवीदिल्ली
मुख्य सचिव यांचे उपसचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणेचे सर्व प्रतिनिधी,
आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे,
प्रधान मुख्य वनसंरक्षक, नागपूर.
जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, जिल्हा पाणलोटविकास युनिट( DWDU)
संचालक, मृदसंधारण व पाणलोटक्षेत्र व्यवस्थापन, महाराष्ट्र राज्य, पुणे
सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, पुणे
संचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे,

संचालक, महाराष्ट्र सुदूर संवेदन केंद्र, नागपूर,
मुख्य कार्यकारी अधिकारी वसुंधरा राज्यस्तरीय पाणलोटविकास यंत्रणा,
सर्व विभागीय कृषि सहसंचालक,
सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
सर्व सहसंचालक, सामाजिक वनीकरण वृत्ते,
सर्व उपसंचालक, सामाजिक वनीकरण,
मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषद,
सर्व सदस्य महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषद,
प्रमुख मार्गदर्शक, महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषद,
महालेखापाल-१/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता ) ( ३ प्रती )
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (३ प्रती )
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई (३ प्रती )
नियोजन विभाग/वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
ग्राम विकास व जलसंधारण विभागाचे सर्व सह सचिव/उप सचिव/ अवर सचिव/ कार्यासन अधिकारी,
जल-८ (निवड नस्ती), ग्रा.वि.व ज.सं.विभाग, मंत्रालय, मुंबई.